श्री संत सेवालाल महाराज, पोहरादेवी
ता. मानोरा जि. वाशिम  या तीर्थक्षेत्राच्या
विकास आराखडयातील विकास कामांना
निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: तीर्थवि-२०२२/प्र.क्र.२६०/यो-६
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१
दिनांक :  २९ मार्च, २०२३

वाचा:-

१) जिल्हाधिकारी, वाशिम यांचे पत्र क्र. जा.क्र. नियोजन/कक्ष-१५/ संस/ ३१३/१९, दि. २१ जानेवारी २०१९ अन्वये सादर केलेला प्रस्ताव.

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जून २०१५.

३) मा. मुख्यसचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दिनांक २१ फेब्रुवारी, २०१९ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

४) मा. मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय शिखर समितीच्या दिनांक ०५ मार्च २०१९ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

५) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: तीर्थवि-२०१७/प्र.क्र.७८/ योजना-६, दि. २२ नोव्हेंबर, २०१७

६) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: तीर्थवि-२०१२/प्र.क्र. ४१/ योजना- ६, दि.०८ मार्च, २०१९

७) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: तीर्थवि-२०१२/प्र.क्र.६२ / भाग-२ / योजना-६, दि. २७ नोव्हेंबर, २०१९

८) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : तीर्थवि २०१९/प्र.क्र.११५/योजना-६, दि. ७ ऑगस्ट, २०२०.

९) जिल्हाधिकारी, वाशीम यांचे पत्र क्र. नियोजन/ कक्ष-१५/संस/८३/२०२१, दि. १९/०१/२०२१

१०) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक तीर्थवि २०१९/प्र.क्र.११५/ योजना-६, दि.३० मार्च, २०२१.

११) ग्रामविकास विभागाचे पत्र क्र. तीर्थवि-२०१९/प्र.क्र.४१(भाग-१)/ यो-६. दि. २२/१०/२०२१

१२) जिल्हाधिकारी, वाशीम यांचे पत्र क्र. नियोजन/ कक्ष-१५/संस/ १०८६/२०२१, दि.१६/११/२०२१.

१३) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक तीर्थवि २०१९/प्र.क्र.११५/ यो-६, दि.२४ जानेवारी, २०२१.

१४) जिल्हाधिकारी, वाशिम यांचे क्र.नियोजन/का-१५/संस/१५५९/२०२२ दि. ६.५.२०२२ रोजीचे पत्र.

१५) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक तीर्थवि २०२२/प्र.क्र.२६०/ योजना-६, दि.१८ ऑक्टोबर, २०२२.

१६) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक तीर्थवि २०२२/प्र.क्र.२६०/ योजना-६, दि.९ जानेवारी, २०२३.

१७) जिल्हाधिकारी, वाशीम यांचे पत्र जा.क्र.नियोजन/कक्ष-१५/संस/११२/२०२३, दि.०६/०२/२०२३.

<u>प्रस्तावना :-</u>

श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयास संदर्भाधीन क्र. ५ व ६ च्या शासन निर्णयान्वये रक्कम रु. १००.०० कोटी इतक्या रक्कमेच्या विकास आराखडयास शासन मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र. ५, ७, ८, १०,१३,१५ व १६ च्या शासननिर्णयान्वये अनुक्रमे रक्कम रू. ५.०० कोटी, रू. ६.०० कोटी रु.७.५० कोटी, रु.२.५० कोटी, रू.१२.५० कोटी, रू.५.२५ कोटी व रू.५.२५ कोटी असा एकूण रक्कम रू. ४४.०० कोटी इतका निधी जिल्हाधिकारी, वाशिम यांना वितरीत करण्यात आला आहे. संदर्भिय पत्र क्र. १७ अन्वये जिल्हाधिकारी, वाशिम यांच्याकडून निधी मागणीचा प्रस्ताव प्राप्त झाला होता. त्यानुसार, सदर तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी करावयाच्या विकास कामांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

**"श्री संत सेवालाल महाराज पोहरादेवी, ता. मानोरा जि.वाशिम या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखड्याकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु. २५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित केला आहे. सदर तरतुदीतून श्री संत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम या तीर्थक्षेत्रातील विकास कामांसाठी रु. ७.०० कोटी इतका निधी जिल्हाधिकारी, वाशिम यांना वितरीत करण्यात येत आहे".**

२. जिल्हाधिकारी, वाशिम यांनी प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामावरच सदर निधी खर्च करावा. तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ५, ६ व ११ मधील मंजूर कामे पूर्ण करण्याकरिता शासन उक्त निधी वितरीत करीत आहे. सबब, सदर निधी संबंधित कार्यान्वयिन यंत्रणेला वितरीत करताना व प्रत्यक्ष खर्च करताना तसेच सदर कामे पूर्ण करताना उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ५, ६ व ११ मध्ये नमूद अटी-शर्ती व त्यामध्ये दिलेले संबंधित निदेश व प्रचलित नियम लागू राहतील.

३. सदर कामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्यांची तांत्रिक मंजूरी असल्याची व बांधकामासाठी आवश्यक जागा ग्रामपंचायत/जिल्हा परिषद मालकीची आहे, याची जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने खात्री करून पुढील कार्यवाही करावी.

४. मंजूर निधीचा योग्य विनियोग होण्यासाठी व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही या दृष्टीने जिल्हाधिकारी, वाशिम यांनी दक्षता घ्यावी, सदर कामांचा त्यांनी वेळोवेळी आढावा घेऊन कामावर देखरेख ठेवावी व कामांचा भौतिक प्रगती अहवाल व खर्चाची माहिति विहित मुदतीत सादर करावी. तसेच, जिल्हाधिकारी, वाशिम यांनी या योजनेकरिता झालेल्या/ होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाशी ताळमेळ घेऊन त्यामध्ये तफावत राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी व सदर निधी

आवश्यक बाबींवर खर्च झाला असल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

५. राज्य शासनामार्फत वेळावेळी प्रस्तुत योजनेविषयी व वित्त विषयक वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले आदेश/नियम/शासननिर्णय/वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करून वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. सदर कामांचे नियोजन व खर्चाचे सनियंत्रण, नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि २०१५/प्र.क. ६/१४४४, दिनांक ४ जुन, २०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यकारी समितीकडे सोपविण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा शासन निर्णयात नमूद केल्यानुसार राहिल.

७. याबाबत प्राप्त होणाऱ्या निधीकरिता जिल्हा नियोजन अधिकारी / सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, वाशिम यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हाधिकारी, वाशिम यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. त्याचप्रमाणे सर्व संबधितांचे लक्ष या विभागाच्या शासन निर्णय दि.१६/११/२०१२ कडे वेधण्यात येत असून पशुहत्त्या व अंधश्रद्धा वाढीला प्रोत्साहन देणाऱ्या तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत केला जाणार नाही. सबब,संबंधित तीर्थक्षेत्रस्थानी असे प्रकार शासनाच्या निदर्शनास आल्यास योग्य ती कार्यवाही केली जाईल व शासकीय अनुदान थांबविले जाईल.

९. जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने कामांच्या अंमलबजावणीसाठी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधावा व कामे विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

१०. उपरोक्त कामांवरील खर्च मागणी क्र.एल ०३, २५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम १९६, जिल्हापरिषदांना सहाय्य (००) (०९) ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम (२५१५२५८४) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

११. सदर निधी नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.५७/१४४४ दि.२२/०२/२०२३ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.१०१/व्यय-१५ दि.०१/०३/२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार वितरीत करण्यात येत आहे. तसेच, वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थसंकल्प-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ मधील अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२५१४१११३२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, pseudonym=C66B420751C8769D652257224AF3DC28B2BA4FF1, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2023.03.29 15:28:10 +05'30'

**(का.गो. वळवी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय,मुंबई.
२) मा. मंत्री, (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. मंत्री, ग्रामविकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. राज्यमंत्री, ग्रामविकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,१/२ , महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.
६) महालेखापाल, लेखा व परिक्षा, १/२, महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) मा.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) मा.प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, अमरावती विभाग, अमरावती.
१२) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम.
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम.
१४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम.
१५) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
१७) नियोजन विभाग (का. १४७४ / १४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
१८) वित्त विभाग (व्यय - १५, अर्थसंकल्प- १६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
१९) कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्रामविकास विभाग,मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती (का. यो-६), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.